**राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँकेकडून आरआयडीएफ -३० अंतर्गत सार्वजनिक बांधकाम विभागाच्या ०५ (ग्रामीण रस्ते ) कामांना रु.२४.१२ कोटी किंमतीचे मंजूर करण्यात आलेले कर्ज स्विकृतीबाबत.**

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
**शासन निर्णय क्रमांकः नाबार्ड-२०२५/प्र.क्र.१२/अर्थबळ**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १९.०५.२०२५

वाचा :- महाव्यवस्थापक, राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँक, पुणे यांचे मंजूरी पत्र क्र.एनबी/ एमआरओ/ एसपीडी/५३७/RIDF-१२१ (A)/आरआयडीएफ-XXX(महाराष्ट्र)/ १४३-आयएससी/२०२४-२५, दि. २८/०३/२०२५.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन पत्रासोबत जोडलेल्या परिशिष्ट-१ मध्ये नमूद असलेले सार्वजनिक बांधकाम विभागाचे ०५ **(ग्रामीण रस्ते )** प्रकल्प पूर्ण करण्याकरीता राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँकेने (नाबार्ड) महाराष्ट्र शासनास ग्रामीण पायाभूत विकास निधी टप्पा-३० (आरआयडीएफ-XXX) अंतर्गत वरील वाचा येथे नमूद केलेल्या मंजूरी पत्रान्वये एकूण रु.२४.१२ कोटी (रुपये चोवीस कोटी बारा लाख फक्त) कर्ज मंजूर केले आहे. सदर कर्ज स्विकृत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

**शासन निर्णय :-**

**(अ)** शासनाने या संदर्भात खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

(१) नाबार्डने आरआयडीएफ-३० अंतर्गत सार्वजनिक बांधकाम विभागाचे ०५ **(ग्रामीण रस्ते )** प्रकल्प पूर्ण करण्याकरिता मंजूर केलेल्या योजनेसाठी रु.२४.१२ कोटी (रुपये चोवीस कोटी बारा लाख फक्त) रकमेचे कर्ज स्विकृत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

(२) **सदर कर्ज ०५ (ग्रामीण रस्ते)** प्रकल्पांना दि. ३१.३.२०२७ पर्यंत पूर्ण करण्याकरिता उपलब्ध राहील.

(३) नाबार्डकडून पुढील निदेश दिले जाईपर्यंत, दि.०९.०४.२०२५ पासून सदर कर्जावरील व्याज ४.७५ टक्के दराने कॅलेंडर वर्षातील दर तीन महिन्याच्या कालावधीनंतर देय आहे.

(४) ज्या प्रकल्पांकरिता हे कर्ज मंजूर झाले आहे, त्या प्रकल्पांवर दिनांक ०१.०४.२०२४ नंतर प्रत्यक्ष झालेल्या खर्चाच्या आधारे देय असणारी कर्जाची रक्कम नाबार्डकडून मंजूर केली जाईल. प्रत्येक वेळी काढण्यात येणारी (शेवटच्या हप्त्याखेरीज) कर्जाऊ रक्कम ही रुपये एक लक्षच्या पटीत असेल आणि प्रत्येक मागणी ही रु.१० लक्ष पेक्षा कमी असणार नाही.

(५) प्रत्येक वेळी काढण्यात येणारी कर्जाची रक्कम ही कर्ज परतफेडीकरिता स्वतंत्र कर्ज आहे असे समजले जाईल. प्रत्येक वेळी काढण्यात येणाऱ्या कर्जाची परतफेड सात वर्षाच्या आत पाच समान वार्षिक हप्त्यात करावयाची आहे. या सात वर्षाच्या कालावधीमध्ये सुरुवातीचा दोन वर्षाचा सवलतीचा कालावधी (ग्रेस पिरिअड) समाविष्ट आहे.

(६) नाबार्डच्या मंजूरी आदेशानुसार प्रकल्प पूर्ण करण्याकरिता शासनाचा सहभाग अधिक नाबार्डकडून उपलब्ध होणारे कर्ज अशी एकूण आर्थिक तरतूद प्रथम शासनाकडून केली जाईल. त्यासाठी आवश्यक ती अर्थसंकल्पीय तरतूद विहित वेळेत व विहीत मार्गाने करावयाची दक्षता सार्वजनिक बांधकाम विभागाने घ्यावी. प्रत्यक्ष खर्च झाल्यानंतर, नाबार्डकडून मिळणारी कर्जाची रक्कम प्रतिपूर्ती स्वरुपात घेण्यात येईल.

(७) नाबार्डने त्यांच्या दिनांक २८.०३.२०२५ च्या पत्रात विहित केलेल्या अटी व शर्ती शासनाने मान्य केलेल्या आहेत, तसेच नाबार्डने केलेल्या सूचनांची नोंद शासनाने घेतली आहे. या कर्ज योजनेकरिता वित्त विभाग "समन्वय विभाग" म्हणून काम पाहील.

(८) शासन नाबार्डला प्रस्तुत कर्जावर सध्या ४.७५ टक्के प्रतिशत प्रतिवर्ष या दराने व्याज अदा करेल. व्याजदराबाबत जे काही निदेश नाबार्डकडून वेळोवेळी प्राप्त होतील त्यानुसार शासन नाबार्डला व्याज अदा करेल. व्याज दर तिमाही कालावधीकरिता एकूण कर्जाच्या शिल्लक रकमेवर देण्यात येईल. कॅलेंडर वर्षाच्या प्रत्येक तिमाहीनंतरच्या महिन्यातील पहिल्या तारखेस व्याज देय राहील. जर व्याज थकीत राहिले तर थकीत दिनांकापासून त्यावर त्यावेळी अंमलात असलेल्या व्याजाच्या दराने व्याज देण्यात येईल.

(९) ज्या प्रकल्पांकरिता कर्ज मंजूर झाले आहे, अशा प्रकल्पांवर दि.०१.०४.२०२५ पासून प्रत्यक्ष केलेल्या खर्चाचे प्रतिपूर्ती स्वरुपातील मागणी अर्ज/ दावे नाबार्डकडे सादर करण्यात येतील.

(१०) कर्ज काढण्याच्या दिनांकापासून सुरुवातीची दोन वर्ष सवलतीचा कालावधी (ग्रेस पिरिअड) म्हणून समजण्यास नाबार्डने सवलत दिली आहे. या सवलतीच्या कालावधीमध्ये कर्जाची परतफेड न करण्याची मुभा नाबार्डने शासनास दिली आहे. हया सवलतीच्या कालावधीची सोय उपलब्ध करुन घेण्याचे शासनाने ठरविले आहे. त्यामुळे प्रत्येकवेळी काढण्यात येणारी कर्जाऊ रक्कम हे एक स्वतंत्र कर्ज राहील व कर्जाची परतफेड दोन वर्षाच्या सवलतीच्या कालावधीनंतर पाच वर्षामध्ये समान हप्त्यात करण्यात येईल.

(११) नाबार्डकडून प्राप्त होणाऱ्या उपरोक्त कर्जाच्या समन्वयासाठी प्रशासकीय विभागस्तरावरील समन्वय अधिकारी म्हणून अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांची व क्षेत्रीय स्तरावरील समन्वय अधिकारी म्हणून मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांची नियुक्ती करण्यात येत आहे. प्रशासकीय विभाग स्तरावरील व क्षेत्रीय स्तरावरील कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसंबंधी सर्व जबाबदारी संबंधित समन्वय अधिकारी यांची राहील.

(१२) या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-१ मध्ये नमूद ०५ (ग्रामीण रस्ते ) प्रकल्पांना दि. ३१/०३/२०२७ पूर्वी पूर्ण करुन, त्याबाबत काम पूर्णत्वाचे प्रमाणपत्र सार्वजनिक बांधकाम विभागाने नाबार्डला दि. ३०/०३/२०२७ पर्यंत सादर करणे बंधनकारक राहील.

**(ब)** नाबार्डकडून मिळणा-या उपरोक्त कर्जाबाबत अनुसरावयाची अर्थसंकल्पीय लेखांकन पध्दती शासन निर्णय, क्रमांक-अर्थऊ-१०९७/प्र.क्र.३४/अर्थबळ, दिनांक २७/०३/१९९८ च्या जोडपत्रात दर्शविल्याप्रमाणे राहील.

**(क)** (१) नाबार्डकडून आरआयडीएफ- XXX खाली सार्वजनिक बांधकाम विभागाच्या प्रकल्पाकरिता मिळणाऱ्या कर्जाच्या बाबतीत "नोडल ऑफीसर" म्हणून सह संचालक, लेखा व कोषागारे, पुणे यांची नियुक्ती करण्यात येत आहे. शासन निर्णय, क्रमांक-अर्थऊ-१०९५/ प्र.क्र.८४/अर्थबळ, दिनांक १२/०२/१९९६ मध्ये पृ.क्र.४ वर "(क)" पुढे नमूद केल्याप्रमाणेच नोडल ऑफीसरच्या जबाबदाऱ्या व कर्तव्य राहतील.

(२) प्रस्तुत प्रकरणी परिचालन अग्रीम घेण्याकरिता शासन अनुमती असून, याबाबत समन्वय अधिकारी तथा सह संचालक, ले. व को. पुणे यांनी आवश्यक ती कार्यवाही प्राधान्याने करावी.

(३) कर्जाची परतफेड करणे व कर्जावरील व्याज प्रदान करणे याकरिता लागणाऱ्या रकमा संबंधित लेखाशिर्षाखालील तरतूदीतून काढण्याचे अधिकार सह संचालक, लेखा व कोषागारे, पुणे यांना प्रदान करण्यात येत आहेत. रकमा काढण्याच्या मंजूरी आदेशावर सही करण्याचे अधिकार"नोडल ऑफीसर" तथा सह संचालक, लेखा व कोषागारे, पुणे यांना अथवा ते ज्या अधिकाऱ्यास प्रदान करतील त्या अधिकाऱ्यास प्रदान करण्यात येत आहेत. नोडल ऑफीसरकरिता विहीत केलेली कार्ये योग्यप्रकारे केली जात आहेत, यावर संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई यांनी देखरेख ठेवावी.

**(ड)** सदर शासन निर्णय नाबार्डच्या दि.२८.०३.२०२५ च्या पत्रानुसार व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने काढण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२५०५१९१५३१०८८७०५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सहपत्रः- वरीलप्रमाणे

Digitally signed by SUNIL SHANKAR SHINDE
Date: 2025.05.19 15:34:43 +05'30'

**( सुनिल शिंदे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) सर्व सन्माननिय सदस्य विधानपरिषद/ विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
८) मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव.
९) उप मुख्यमंत्री ( वित्त ) यांचे सचिव/ उप मुख्यमंत्री ( नगर विकास ) यांचे प्रधान सचिव.
१०) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१२) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१३) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानभवन सचिवालय, मुंबई, (५प्रती)
१४) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५) वित्त विभाग (साउ /व्यय-११ /ऋण व हमी नियंत्रण कक्ष), मंत्रालय, मुंबई.
१६) कार्यासन अधिकारी-नियो-१-अ, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई--४०० ०३२.
१७) संबंधित वित्तीय संस्था (विभागामार्फत).
१८) निवडनस्ती/अर्थबळ

**SCHEDULE I**
**RIDF XXX - RURAL CONNECTIVITY PROJECTS (ROADS) - FINANCIAL & PHASING DETAILS**
**STATE - MAHARASHTRA**
**Name of the Implementing Department: Public Works Department**

(Rs.lakh)

| Sr. No. | Name of the Project | Block / Taluka | District | Length - Roads (Km) | Total Financial Outlay (TFO) / Updated Project Cost | Ineligible Cost | Eligible Cost (Col 8 - Col 9) | Expenditure incurred up to 31 March 2024 | Balance Eligible Cost as on 01.04.2024 | RIDF Tranche XXX Loan* | | | Further State Govt. contribution |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | | | 2025-26 | 2026-27 | TOTAL | |
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 | 11 | 12 | 13 | 14 |
| A. | **ROAD PROJECTS** | | | | | | | | | | | | |
| 1 | Widening & Improvement to Bhondavade Ambavade Budruk Sayali Vadgaon Sawali Kurulbaji Kudeghar Rohot Pateghar Alawadi Dhawali road MDR-143 from Km 14/000 to 19/950 (Section - Punvadi to Pateghar) Tal. & Dist. Satara | Satara | Satara | 5.95 | 1000.00 | 0.00 | 1000.00 | 0.00 | 1000.00 | 400.00 | 400.00 | 800.00 | 200.00 |
| 2 | Widening & Improvement to MDR-29 Parali Banghar Kus Bk. Khadgaon Takawali Nigudmal Nitral Katawadi Kelawali Dhangarwadi Dhawali to MDR-26 road MDR-144 from Km 5/000 to 12/350 (Section - Banghar to Nigudmal), Tal. & Dist. Satara | Satara | Satara | 7.35 | 950.00 | 0.00 | 950.00 | 0.00 | 950.00 | 380.00 | 380.00 | 760.00 | 190.00 |
| 3 | Improvement to Belora Dhamak Yeoti Pimpri Kalga Waghoda Fubgaon road MDR-32 Km 7/000 to Km 8/500 & 14/400 to Km 21/000 Tal. Nandgaon Kh. Dist. Amravati | Nandgaon | Amravati | 8.10 | 650.00 | 0.00 | 650.00 | 0.00 | 650.00 | 260.00 | 260.00 | 520.00 | 130.00 |
| 4 | Construction of minor bridge near Kasarshirambe village at Km 8/800, & Improvements to NH-4 to Kalavade Belvade Kasarshirambe Salshirambhe road MDR-62 Km 06/000 to 9/400 (Part - Belvade Budruk to Kasarshirambe) Tal. Karad, Dist. Satara | Karad | Satara | 3.40 | 275.00 | 0.00 | 275.00 | 0.00 | 275.00 | 110.00 | 110.00 | 220.00 | 55.00 |
| 5 | Improvements to MDR-26 road to Ekiv Sahyadrinagar road (VR-174) at Km 0/00 to Km 4/00 Tal. Jawali, Dist. Satara | Jawali | Satara | 4.00 | 140.00 | 0.00 | 140.00 | 0.00 | 140.00 | 56.00 | 56.00 | 112.00 | 28.00 |
| | **TOTAL ROADS (A)** | | **(in km)** | **28.800** | **3015.00** | **0.00** | **3015.00** | **0.00** | **3015.00** | **1206.00** | **1206.00** | **2412.00** | **603.00** |

***** *If the State Government is able to execute the project ahead of phasing, then the loan will be relassed accordingly*

